**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती या संस्थेस यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

**शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२५/प्र.क्र.१५९/प्रशा-१,**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.

दिनांक : २३ एप्रिल, २०२५.

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.: संवैशिवस/म/ शावैमवसरुबा/प्र.मा./१३८०/२०२५, दिनांक : १४.०२.२०२५.

**शासन निर्णय :-**

विभागाच्या नियंत्रणाखालील पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती या संस्थेकरीता यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी हाफकीन महामंडळास वर्ग करण्यात आलेल्या रुपये १२,००,००,०००/- इतक्या निधीतून खरेदी प्रक्रिया पुर्ण झाली नसल्याने खालील तक्त्यात नमूद केलेली यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यास एकूण रुपये ११,९०,००,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी, नव्वद लक्ष फक्त) (सर्व करांसहित) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग संख्या | प्रती नग किंमत (सर्व करांसहीत) | एकूण रक्कम (सर्व करांसहीत) |
|---|---|---|---|---|
| १. | व्हिडिओ ब्रॉंकोस्कोप | १ | ३८,००,००० | ३८,००,००० |
| २. | र्टप सेट | १ | ४०,००,००० | ४०,००,००० |
| ३. | व्हेन्टीलेटर | १० | २८,००,००० | २,८०,००,००० |
| ४. | डायड लेजर फॉर पाईल्स | १ | २२,००,००० | २२,००,००० |
| ५. | डायड लेजर फॉर वेरिकास वेन | १ | २६,००,००० | २६,००,००० |
| ६. | लेरिंगोस्कोप | १ | २४,००,००० | २४,००,००० |
| ७. | हाय एन्ड अल्ट्रासाउन्ड सिस्टीम विथ ७ ३डि/४डि | २ | १,४०,००,००० | २,८०,००,००० |
| ८. | ॲनेस्थेसिया वर्कस्टेशन विथ मल्टीपॅरा ८ मॉनिटर विथ व्हेन्टीलेटर (हाय रेंज) | १० | ४८,००,००० | ४,८०,००,००० |
| | एकूण | | | ११,९०,००,००० |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता सदर संस्थेतील हाफकीन महामंडळास यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी वर्ग करण्यात आलेल्या निधीमधून करण्याच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे. यासाठी राज्य शासनाकडून वेगळ्याने निधी उपलब्ध होणार नाही.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावेत. सदर दर हे बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने याबाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबतची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

४) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे (Technical specification) व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची असावीत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांची राहील.

५) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत/खरेदीची व्दिरुक्ती होणार नाही व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

६) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे.

१०) सदर यंत्रसामग्री खरेदी प्रक्रिया हाफकीन महामंडळामार्फत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दती राबवून करण्यात यावी.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस हाफकिन महामंडळास वर्ग करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा. यासाठी राज्य शासनाकडून वेगळ्याने निधी उपलब्ध होणार नाही.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२३११५७३२२०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.04.23 17:51:15 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
२) महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३) महाव्यवस्थापक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स् कॉपोरेशन लि., मुंबई
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५) अधिष्ठाता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७) निवडनस्ती (प्रशा-१).